केंद्र पुरस्कृत दिनदयाळ अपंग पुनर्वसन योजना (DDRS) तसेच अपंग व्यक्तींना कृत्रिम अवयव व साधन वाटप (ADIP) या योजनांतर्गत स्वयंसेवी संस्थांचे प्रस्ताव सादर करण्याच्या कार्यप्रणालीबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - न्यायाप्र- २०१६/ प्र.क्र. ०२/ अ.क. -२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ०९.०६.२०१७.

संदर्भ- आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.०२.०५.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल सुमोटो जनहित याचिका क्र.३५/२०११- नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या याचिकेसंदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि. १९.८.२०१६ च्या आदेशान्वये, केंद्र शासनाच्या दिनदयाळ अपंग पुनर्वसन योजना (DDRS) योजनेंतर्गत स्वयंसेवी संस्थांच्या प्रस्तावांबाबत कार्यवाही करण्यासाठी सर्व संबंधीतांना (जिल्हा समाज कल्याण अधिकारी-१ महिना, आयुक्त, अपंग कल्याण-२आठवडे, राज्य शासन- ६आठवडे व केंद्र शासन- ६आठवडे) कालवधी विहीत केला असून त्यानुसार सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी तथा संबंधीतांना आवश्यक त्या सुचना देण्याबाबत निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी दि.०२.०५.२०१७ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र पुरस्कृत दिनदयाळ अपंग पुनर्वसन योजना (DDRS) तसेच अपंग व्यक्तींना कृत्रिम अवयव व साधन वाटप (ADIP) या योजनांतर्गत स्वयंसेवी संस्थांचे प्रस्ताव सादर करण्याची कार्यप्रणाली विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाच्या अनुषंगाने केंद्र पुरस्कृत दिनदयाळ अपंग पुनर्वसन योजना (DDRS) तसेच अपंग व्यक्तींना कृत्रिम अवयव व साधन वाटप (ADIP) या योजनांतर्गत स्वयंसेवी संस्थांचे प्रस्ताव विविध स्तरावर सादर करण्याची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे दोन टप्प्यामध्ये विहीत करण्यात येत आहे.

I. **टप्पा -१**

| अ. क्र. | प्रस्ताव सादर करावयाची कार्यवाही | विहीत कालावधी |
|---|---|---|
| १ | राज्यातील स्वयंसेवी संस्थांनी वरील योजनांच्या मार्गदर्शक सुचनानुसार विहित कागदपत्रासह (ऑनलाईन पध्दतीने व हार्डकॉपीमध्ये) प्रस्ताव जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जि.प./सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर/उपनगर कार्यालयास सादर करणे. | माहे- जुन अखेर पर्यंत |
| २ | जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर/उपनगर हे विहित मुदतीत प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी व पडताळणी प्रस्ताव प्राप्त झालेल्या दिनांकपासून एका आठवडयात करतील व काही त्रुटी/उणीवा असल्यास त्याची पुर्तता करण्याबाबत संबंधित स्वयंसेवी संस्थांना सुचित करतील. जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहाय्यक आयुक्त यांनी असे पात्र तथा परिपुर्ण प्रस्ताव वर्गवारीप्रमाणे तपासणी अहवाल तसेच स्वयंस्पष्ट अभिप्रायासह आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्याकडे सादर करणे. | माहे- जुले अखेर पर्यंत |

| | | |
|---|---|---|
| ३ | आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी विहित मुदतीत प्राप्त प्रस्तावाची नियमानुसार अटी व शर्ती प्रमाणे छाननी करुन परिपूर्ण प्रस्ताव (ऑनलाईन पध्दतीने व हार्डकॉपीमध्ये) शिफारशीसह शासनाकडे सादर करणे. | दि१५.ऑगस्ट पर्यंत |
| ४ | राज्य शासनास विहित मुदतीत प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव एकत्रितरित्या राज्य शासन स्तरावर गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीपुढे ठेवण्यात येवून समितीने मंजूर केलेले प्रस्ताव राज्य शासनामार्फ़त केंद्र शासनास आवश्यक त्या शिफारसी व इतिवृत्तासह सादर करणे. | माहे- सप्टेंबर अखेर पर्यंत |

II. <u>टप्पा-२</u>

| **अ. क्र.** | **प्रस्ताव सादर करावयाची कार्यवाही** | **विहीत कालावधी** |
|---|---|---|
| १ | राज्यातील स्वयंसेवी संस्थांनी वरील योजनांच्या मार्गदर्शक सुचनानुसार विहित कागदपत्रासह (ऑनलाईन पध्दतीने व हार्डकॉपीमध्ये) प्रस्ताव जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जि.प./सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर/उपनगर कार्यालयास सादर करणे. | माहे- सप्टेंबर अखेर पर्यंत |
| २ | जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर/उपनगर हे विहित मुदतीत प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी व पडताळणी प्रस्ताव प्राप्त झालेल्या दिनांकपासून एका आठवडयात करतील व काही त्रुटी/उणीवा असल्यास त्याची पुर्तता करण्याबाबत संबंधित स्वयंसेवी संस्थांना सुचित करतील. जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहाय्यक आयुक्त यांनी असे पात्र तथा परिपुर्ण प्रस्ताव वर्गवारीप्रमाणे तपासणी अहवाल तसेच स्वयंस्पष्ट अभिप्रायासह आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्याकडे सादर करणे. | माहे- ऑक्टोबर अखेर पर्यंत |
| ३ | आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी विहित मुदतीत प्राप्त प्रस्तावाची नियमानुसार अटी व शर्ती प्रमाणे छाननी करुन परिपूर्ण प्रस्ताव (ऑनलाईन पध्दतीने व हार्डकॉपीमध्ये) शिफारशीसह शासनाकडे सादर करणे. | दि१५.नोव्हेंबर पर्यंत |
| ४ | राज्य शासनास विहित मुदतीत प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव एकत्रितरित्या राज्य शासन स्तरावर गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीपुढे ठेवण्यात येवून समितीने मंजूर केलेले प्रस्ताव राज्य शासनामार्फ़त केंद्र शासनास आवश्यक त्या शिफारसी व इतिवृत्तासह सादर करणे. | माहे- डिसेंबर अखेर पर्यंत |

२. सर्व संबंधीतांना सुचित करण्यात येते की, केंद्र पुरस्कृत दिनदयाळ अपंग पुनर्वसन योजना (DDRS) तसेच अपंग व्यक्तींना कृत्रिम अवयव व साधन वाटप (ADIP) या योजनांतर्गत स्वयंसेवी संस्थांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वरीलप्रमाणे विहीत केलेल्या कार्यप्रणालीनुसार कर्यावाही करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०६०९१२४५३२४४२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3f d836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.07.06 11:55:10 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

१) मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी संचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव (सा.न्या), यांचे वरिप्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई ( प्रसिध्दीसाठी)
५) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) आयुक्त, समाज कल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे,
७) सचालक, वि.जा.भ.ज.व इ.मा.व. संचालनालय, पुणे,
८) सर्व जिल्हाधिकारी,
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण,
११) सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर/उपनगर,
१२) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
१३) निवड नस्ती, अ.क.२.